**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील विभागीय चौकशीबाबतच्या प्रकरणांचे कामकाज हाताळण्यासाठी दोन सेवानिवृत्त अधिका-यांची करार पध्दतीने नियुक्ती करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय, क्रमांक : आस्थाप्र-२०१६/प्र.क्र.४३९/आस्था-१**

मंत्रालय (विस्तार), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०१ जुलै, २०१७

**वाचा:-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६.

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांचा तातडीने निपटारा करण्याच्या अनुषंगाने आस्थापना विषयक बाबींचे सखोल ज्ञान असलेल्या, राज्य शासनाच्या सेवेतून सेवानिवृत्त झालेल्या दोन अधिका-यांची करार पध्दतीने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त कार्यवाहीसाठी प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरातीच्या अनुषंगाने प्राप्त अर्जांमधून आवश्यक असलेली शैक्षणिक अर्हता, कामाचा अनुभव लक्षात घेता पुढे नावे नमुद केलेल्या सेवानिवृत्त अधिका-यांची सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांचे कामकाज हाताळण्यासाठी कंत्राटी तत्वावरील कर्मचारी म्हणुन ते हजर झाल्यापासून ११ महिन्यांच्या कालावधीसाठी करार पध्दतीने नियुक्ती करण्यात येत आहे. संबंधितांनी या कार्यालयात तात्काळ रुजु व्हावे.

| अ.क्र. | सेवानिवृत्त अधिका-यांचे नाव | सेवानिवृत्तीच्यावेळचे पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. विजयकुमार विष्णू दपके | अवर सचिव |
| २ | श्री. अविनाश धोंडीराम गांगुर्डे | कक्ष अधिकारी |

२. **सदर सेवानिवृत्त अधिका-यांच्या करार पध्दतीने नियुक्तीच्या कालावधीतील कर्तव्ये व जबाबदा-या पुढीलप्रमाणे राहतील:-**

१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांचा तातडीने निपटारा करण्याच्या अनुषंगाने कामकाज करणे.
२) शासनाकडून वेळोवेळी सोपविलेले कामकाज हाताळणे.

३. तसेच, सदर सेवानिवृत्त अधिका-यांच्या करार पध्दतीने नियुक्तीच्या कालावधीत त्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील पुढील अटी व शर्ती लागु राहतील:-

१) करार पध्दतीने नियुक्ती देण्यात आल्यामुळे संबंधितास शासनाच्या कोणत्याही संवर्गात सेवा समावेशनाबाबत / समावुन घेण्याचे वा नियमित सेवेचे इतर कोणतेही लाभ मिळण्याचा अधिकार / हक्क नसेल.
२) नियुक्तीसाठी सक्षम प्राधिकारी यांना विशेष परिस्थितीत कोणत्याही वेळी अशा अधिका-यांच्या करार पध्दतीवरील सेवा समाप्त करण्याचे अधिकार राहतील.
३) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेली व्यक्ती, सोपविलेली सेवा पार पाडण्याच्या कामात व्यत्यय निर्माण होईल, अशा कोणत्याही व्यावसायिक कामात गुंतलेली नसावी.
४) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तीने गुंतलेले हितसंबंध (conflict of interest) जाहीर करणे आवश्यक राहील.
५) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांना प्राप्त होणा-या कागदपत्रे / माहिती व आधारसामुग्रीबाबत गोपनीयता पाळणे आवश्यक राहील.
६) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांच्यावर सोपविलेले कामकाज निश्चित केलेल्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक राहील. त्यांच्या कामकाजाबाबत नियुक्तीसाठी सक्षम असलेले प्राधिकारी वेळोवेळी आढावा घेऊन कामाचे मुल्यमापन करतील.

४. सदर सेवानिवृत्त अधिका-यांच्या करार पध्दतीने नियुक्तीच्या कालावधीकरिता मानधन व अन्य भत्ते / सुविधा सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात येतील.

५. या प्रकरणी येणारा खर्च मागणी क्र. एन-२, २२५१-सचिवालय-सामाजिक सेवा, ०९०-सचिवालय, (०१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, दत्तमत (२२५१०११३), १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७०४१५३१०८९८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2017.07.04 15:31:33 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४) मा. मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
६) सर्व सह / उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ०३२.
७) अवर सचिव (लेखाशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ०३२.
८) सर्व संबंधित सेवानिवृत्त अधिकारी.
९) निवडनस्ती